**तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२५ करीतामानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- इतके अनुदान देण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

शासन निर्णय क्रमांक : बीजीटी-२०२४/प्र.क्र.५१/अर्थसंकल्प

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :-१४ जून, २०२५

**वाचा** :-१) मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील दि.१४.०६.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त, नगर विकास विभाग, शासन पत्र क्र.बैठक-२०२४/प्र.क्र.२१८/नवि-१८, दि.२२.०६.२०२४

२) नगर विकास विभाग, शासन आदेश क्र.बैठक-२०२४/प्र.क्र.२१८/नवि-१८, दि.२२.०६.२०२४

३) शासन पत्र सममांक दि.२४.०६.२०२४ व दि.२६.०६.२०२४

४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/३३८/२०२४, दि.२५.०६.२०२४

५) शासन निर्णय समक्रमांक दि.०१.०७.२०२४

**प्रस्तावना :-**

तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१४ जून, २०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीत तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२४ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या प्रत्येक दिंडीला रु.२०,०००/- इतके अनुदान सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत देण्याबाबत निदेश दिले आहेत. या संदर्भात आदर्श मानके निश्चित करण्यासाठी (Standard Operating Procedure) नगर विकास विभागाने दि.२२ जून, २०२४ रोजीच्या आदेशान्वये विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत केली असून सदर समितीने अहवाल सादर केला होता. गतवर्षीप्रमाणे याही वर्षी सन २०२५ मध्ये तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२५ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या ११०९ दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- इतके अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२४ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या प्रत्येक दिंडीला रु.२०,०००/- इतके अनुदान सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत देण्याबाबत संदर्भाधीन क्र. ५ येथील दि.०१.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सन २०२३-२४ मध्ये विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून एकूण ११०९ दिंड्यांची यादी प्राप्त झाली होती. त्यानुसार गतवर्षीप्रमाणे याही वर्षी सन २०२५ मध्ये तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२५ करिता मानाच्या १० पालख्यांसोबतच्या ११०९ दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- (अक्षरी रुपये वीस हजार फक्त) याप्रमाणे एकूण रु.२,२१,८०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकवीस लाख ऐंशी हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्त, पुणे यांनी गेल्यावर्षीप्रमाणे मानाच्या १० पालख्यांसोबतच्या ११०९

दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- (अक्षरी रुपये वीस हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

३. दिंडी प्रमुखांच्या खात्यावर निधी जमा करण्याच्या कार्यवाहीसाठी आभासी वैयक्तिक ठेव लेखा VPDAप्रणालीस सूट देण्यात येत आहे. एम.टी.आर.३१ वर देयके सादर करण्यास व शासन निर्णय दि.१७.४.२०१५ मध्ये नमूद मर्यादेपेक्षा जास्त खर्च करण्यास तसेच देयकांसोबत उपप्रमाणाऐवजी ११०९ दिंड्यांच्या यादीवर Pass for payment करुन देयके कोषागारामध्ये सादर करण्यास याद्वारे विशेष बाब म्हणून मंजूरी देण्यात येत आहे.

४. एम.टी.आर.३१ वर देयके सादर करण्यास मंजूरी देण्यात आली असल्यामुळे दरपत्रकाची साक्षांकित प्रत जोडण्याची अट व माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाची मान्यता घेण्याची तसेच देयकांसोबत जाहिरातीचा आकार विहित आकार दर्शविणारे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र व तिसरी प्रत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास पाठविण्याची अट आणि देयकांसोबत उपप्रमाणाऐवजी या ११०९ लाभार्थ्यांच्या यादीवर Pass for payment करुन देयके कोषागारामध्ये सादर करण्यास याद्वारे विशेष बाब म्हणून मंजूरी देण्यात आली असल्याने सदर लाभार्थ्यांच्या यादीलाच उपप्रमाणक म्हणून ग्राह्य धरण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर प्रकरणी जाहिराती संबंधीत उपरोक्त सर्व अटी शिथिल करण्यात येत आहेत.

५. यासाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.एन-३ मधील लेखाशिर्ष २२३५बी३६१, २६-जाहिरात व प्रसिध्दी" या उद्दिष्टाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. सदरील योजेनेसाठी निधी वितरणास उपायुक्त सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" एक वेळची बाब म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच सदर अनुदानाची रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना प्राधिकृत करण्यात आले आहे.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.४.२०१५ वित्तीय अधिकर नियम पुस्तिका, १९७८, भाग-१ उपविभाग-२, मधील अ.क्र.८, नियम क्र.१७, नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६१४/२०२५/व्यय-१४, दि.१४.०६.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१६१५०२३६५४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.06.16 15:03:57 +05'30'

( प्रशान्त पुं. वाघ )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग
६. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १ / २ मुंबई / नागपूर
८. अवर सचिव, रोखशाखा, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. मा. श्री. अक्षयमहाराज भोसले, सातारा, प्रदेशाध्यक्ष, शिवसेना धर्मवीर अध्यात्मिक सेना, महाराष्ट्र
१६. निवडनस्ती (अर्थसंकल्प/विघयो)